**सामाजिक न्याय विभागाच्या विशेष घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीच्या कृषी पंप ग्राहक लाभार्थ्यांना वीज दरात सवलतीसाठी सन २०२१-२२ मध्ये अनुदान वितरण मागणी क्र.एन-३ (मुख्यलेखाशिर्ष २८०१५६६१).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२१/प्र.क्र.५४/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २५ मार्च, २०२२

<u>वाचा -:</u> १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२०प्र. क्र. ०६/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२०
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१
४) महावितरण कंपनीचे पत्र क्र. पी.कॉम/शासन/(SCP)मागणी/सवलत/१००४१, दिनांक १८ मे, २०२१.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२०/प्र.क्र.०९/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०२ सप्टेंबर, २०२१
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
७) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.निधिवि-२०२१/प्र.क्र.५४/ऊर्जा-३,दि.१७ सप्टेंबर, २०२१
८) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.निधिवि-२०२१/प्र.क्र.५४/ऊर्जा-३,दि.१४ डिसेंबर, २०२१
९) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.निधिवि-२०२१/प्र.क्र.६४/ऊर्जा-३, दि.०४ मार्च, २०२२
१०)वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२२
११) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२०/प्र.क्र.०७/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २४ मार्च, २०२२

**<u>प्रस्तावना:-</u>**

राज्यातील कृषीपंपधारकांना दरवर्षी सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यात येतो व त्याची प्रतिपूर्ती करण्यासाठी महावितरण कंपनीस अर्थसहाय्य देण्यात येते. सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या विशेष घटक योजनेंतर्गत अनुसूचीत जातीच्या संबंधीत कृषीपंपधारक या वैयक्तिक लाभार्थ्यांना वीज दरात सवलत देण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने सन २०२१-२२ करिता महावितरण कंपनीस अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी रु. १९२.८६ कोटी इतकी तरतूद केली आहे. तसेच डिसेंबर, २०२१ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रू. २००.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

२. उपरोक्त एकूण रु. ३९२.८६ कोटी तरतूदीपैकी वित्त विभागाच्या संदर्भिय शासन निर्णय क्र.६ मधील सूचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने उपलब्ध केलेला रु. ३१५.७१६० कोटी निधी उपरोक्त क्र.७,८ व ९ अन्वये वितरीत केला आहे. आता सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने उपरोक्त क्र.११ अन्वये रू. ७७.१४४ कोटी इतकी तरतूद महावितरण कंपनीस वितरीत करण्यासाठी प्रशासकीय विभाग म्हणून ऊर्जा विभागास उपलब्ध करून दिली आहे. सदर तरतूद रू. ७७,१४,४०,०००/- (रूपये सत्याहत्तर कोटी चौदा लाख चाळीस हजार फक्त ) महावितरण कंपनीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसूचीत जाती घटक कार्यक्रमाअंतर्गत अनुसूचीत जाती घटकांतर्गत वैयक्तिक लाभार्थी कृषीपंपधारकांना वीज दरात सवलत देण्यासाठी रू.७७,१४,४०,०००/- (रूपये सत्याहत्तर कोटी चौदा लाख चाळीस हजार फक्त ) महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम फक्त अनुसूचीत जाती घटकांतर्गत लाभार्थ्यांवरच वीज दरात सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ ने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी. तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.एन-३, २८०१, वीज, उप मुख्यलेखाशिर्ष-०५ पारेषण व वितरण, गौणशिर्ष ७८९ अनुसूचीत जाती घटक योजना, गट शिर्ष (०१) अनुसूचीत जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना उप गट शिर्ष (०१) (०२) कृषी पंप ग्राहकांना वीज दरात सवलत (कार्यक्रम) योजना सांकेतांक (२८०१५६६१) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. नारायण श्री. कराड, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रू. ७७,१४,४०,०००/- (रूपये सत्याहत्तर कोटी चौदा लाख चाळीस हजार फक्त ) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक २४.०३.२०२२ च्या शासन निर्णयानुसार व सदर शासन निर्णयातील वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १४९/२०२२, व्यय-१४, दि.०८.०३.२०२२ अन्वये मान्यता दिल्यानुसार सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०३२५१५०६४७५४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.03.25 15:07:39 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१
२. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प-विघयो) मंत्रालय, मुंबई ३२
४. उप सचिव (ऊर्जा-५) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
५. मा.विरोधी पक्ष नेता विधानपरिषद/विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. महालेखापाल,(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०,
७. महालेखापाल,(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर-२,
८. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि), मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,
१०. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२
११. वित्त विभाग (१६ व्यय/साऊ/साधनसंपत्ती/१३ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२. निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.